**उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील विद्यापीठे तसेच उच्च शिक्षण संस्थांमध्ये महाराष्ट्र राज्याचे तृतीयपंथीयांसाठीचे धोरण- २०२४ च्या अनुपालनासंदर्भातील मार्गदर्शक सूचनाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:एनईपी-२०२२/प्र.क्र.०९/विशि-३, (भाग-२) शिकाना**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: १५ मार्च, २०२४

**संदर्भ:- १.**तृतीयपंथीय व्यक्ती (हक्कांचे संरक्षण) अधिनियम, २०१९
२. तृतीयपंथीय (हक्कांचे संरक्षण) नियम,२०२०
३. राष्ट्रीय मानव अधिकार आयोग यांच्या दिनांक १५.०९.२०२३ च्या मार्गदर्शक सूचना
४. उच्च व तंत्र शिक्षण, शासन निर्णय क्रमांक:एनईपी-२०२२/प्र.क्र.०९/विशि-३, (भाग-२) शिकाना दि.७ डिसेंबर, २०२३
५. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. तृतीय-२०२३/ प्र.क्र.१२२/ सामासु दिनांक ११ मार्च, २०२४

**प्रस्तावना-**

तृतीयपंथीय व्यक्ती (हक्कांचे संरक्षण) अधिनियम, २०१९, तृतीयपंथीय (हक्कांचे संरक्षण) नियम,२०२०, राष्ट्रीय मानव अधिकार आयोग यांच्या दिनांक १५.०९.२०२३ च्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. तृतीय-२०२३/ प्र.क्र.१२२/ सामासु दिनांक ११ मार्च, २०२४ अन्वये महाराष्ट्र राज्याचे तृतीयपंथीयांसाठीचे धोरण- २०२४ जाहीर केले आहे.

मानवाधिकार संरक्षण कायदा, १९९३ अंतर्गत, राष्ट्रीय मानव अधिकार आयोगाकडे (NHRC) देशातील सर्व व्यक्तींच्या मानवी हक्कांचे संरक्षण आणि संवर्धन करण्याची जबाबदारी सोपविण्यात आली आहे. ट्रान्सजेंडर/तृतीयपंथीय व्यक्तींना जीवनाच्या अनेक पैलूंमध्ये भेदभावाचा सामना करावा लागतो. या आव्हानांना तोंड देण्यासाठी, तसेच ट्रान्सजेंडर/ तृतीयपंथीय व्यक्तींचे कल्याण आणि अधिकारांचे संरक्षण होण्यासाठी आयोगाने दि.१५ सप्टेंबर, २०२३ रोजीच्या पत्रान्वये केंद्र आणि राज्य सरकारांना मार्गदर्शक सूचना केल्या आहेत. या सर्व मार्गदर्शक सूचनांची संबंधित प्रशसकीय विभागाकडून काटेकोर अंमलबजावणी करण्याबाबत आवश्यक त्या सूचना निर्गमित करण्याचे संदर्भाधीन दिनांक ११.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सूचित करण्यात आले आहे.

राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-२०२० मधील सर्वसमावेशक शिक्षण पद्धती व समानता या मुद्यांच्या अंमलबजावणीसाठी, तृतीयपंथीयांच्या हक्कांचे आणि हिताचे रक्षण करण्यासाठी, तृतीयपंथियांसाठी उच्च शिक्षण संस्थांमध्ये सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णयः-**

राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-२०२० मधील सर्वसमावेशक शिक्षण पद्धती व समानता या मुद्यांच्या अंमलबजावणीसाठी, तृतीयपंथीयांच्या हक्कांचे आणि हिताचे रक्षण करण्यासाठी, तृतीयपंथियांसाठी शैक्षणिक संस्थांमध्ये सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

१. संदर्भाधीन अधिनियम, नियम यामधील तरतूदी तसेच मार्गदर्शक सूचनांचे काटेकोर पालन राज्यातील सर्व अकृषि विद्यापीठे, स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठे, अभिमत विद्यापीठे आणि संलग्नित महाविद्यालयांनी करावे.

२. उच्च शिक्षणात ट्रान्सजेंडर्स/ तृतीयपंथीय विद्यार्थ्यांशी भेदभाव केला जाऊ नये. तृतीयपंथीय समावेशक धोरण स्विकारुन लिंगभेद, लैंगिकतेच्या आधारावर होणारी उपेक्षा, अवहेलना व विलगीकरण अशा समस्यांचे निरसन करण्यात यावे.

३. तृतीयपथीयांविषयीचा पूर्वग्रह, भेदभाव, मानसिक छळवणूक, लैंगिक शोषण आणि ट्रान्सजेंडर्स/ तृतीयपंथीय व्यक्तींवरील इतर हिंसा इत्यादी समस्यांचे निराकरण करण्यासाठी सर्व अकृषि विद्यापीठे, स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठे, अभिमत विद्यापीठे,संलग्नित महाविद्यालयांनी देखरेख समिती/ सेल स्थापन करण्यात यावा.

४. तृतीयपंथीय या घटकातील वर्गास शिक्षण, नोकरी व शासकीय योजनांमध्ये लिंग पर्यायांमध्ये **स्त्री, पुरुष** व **तृतीयपंथी** असे पर्याय उपलब्ध करुन देण्याबाबत दिनांक ३ मार्च, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्देश दिले आहेत, उच्च शिक्षण संस्थांमधील प्रवेश व अन्य शैक्षणिक योजनांसाठी त्याचे अनुपालन करण्यात यावे.

५. ज्या उच्च शिक्षण संस्था लैंगिकतेच्या आधारावर प्रवेश देण्यास नकार देतील अथवा टाळाटाळ करतील अशा संस्थांवर संबंधित विद्यापीठाकडून नियमोचित कारवाई करण्यात यावी.

६. महाविद्यालये व विद्यापीठामध्ये तृतीयपंथी विद्यार्थ्यांना समान संधी उपलब्ध होण्याच्या व सन्मानाने जगता येण्याच्या दृष्टीने तृतीयपंथीयांना सामाजिक जीवनाचा अविभाज्य घटक म्हणून पाहण्यासाठी सर्व विद्यार्थ्यांमध्ये तसेच संस्थेतील शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचा-यांमध्ये तृतीयपंथीयांबाबत जाणीव जागृती निर्माण करण्यासाठी विविध उपक्रमांचे आयोजन करण्यात यावे.

७. तृतीयपंथी विद्यार्थ्यांना सर्व प्रकारच्या शैक्षणिक/ सांस्कृतिक/ क्रीडा उपक्रमांमध्ये इतर विद्यार्थ्यांसमवेत समान रीतीने सामावून घेण्यात यावे.

८. तृतीयपंथी विद्यार्थ्यांना समुपदेशन, शैक्षणिक सल्ला आणि करिअर मार्गदर्शन यासह सर्वसमावेशक सेवा उपलब्ध करण्यासाठी समन्वय कक्ष/ समन्वयक नियुक्त करण्यात यावा.

९. ज्या विद्यापीठामध्ये व ज्या उच्च शिक्षण महाविद्यालय/ संस्था मध्ये वसतिगृहाची सुविधा आहे अशा वसतिगृहांमध्ये तृतीयपंथीयांसाठी स्वतंत्र कक्ष राखीव ठेवण्यात यावे.

१०. संदर्भ क्र.४ येथील दिनांक ०७.१२.२०२३ च्या शासन निर्णयान्वये तृतीयपंथीय विद्यार्थ्यांना उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील शिक्षणक्रमासाठी शैक्षणिक फी (शैक्षणिक शुल्क) माफ करणेबाबत देण्यात आलेल्या निदेशांचे सर्व संबंधित विद्यापीठांनी काटेकोर पालन करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३१५१३३८१३५६०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2024.03.15 13:47:48 +05'30'

**( अजित बाविस्कर )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई

५. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
७. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
८. कुलगुरु, सर्व अकृषि विद्यापीठे महाराष्ट्र राज्य
९. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई
१२. सर्व सह/ उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
१३. निवडनस्ती (विशि-३).